# बुकर टी. वॉशिंगटन

## एका गुलामाचा संघर्ष





**बुकर टी. वॉशिंगटन**

नागरी युद्धापूर्वीच्या काळात अमेरिकेच्या दक्षिणेकडील राज्यांमध्ये सर्व निग्रो हे गुलाम होते. बुकर टी. वॉशिंगटनला त्याच्या गोऱ्या मालकासाठी खूप काम करावं लागत असे. बुकर टी. वॉशिंगटनला नागरी युद्धाच्या नंतरच्या काळात रात्री शाळेत जाणं शक्य झालं. पुढे तो एक शिक्षक बनला आणि इतर निग्रो लोकांची मदत करू लागला. नंतर निग्रो लोकांनी स्वतः स्थापन केलेल्या शाळेचा तो मुख्याध्यापक झाला. हे अशा एका महान व्यक्तीचं चरित्र आहे जो गुलाम म्हणून जन्माला आला पण मोठा होऊन त्याने इतर गुलामांना स्वतंत्र आयुष्य जगण्यासाठीचा मार्ग दाखवला.



बुकर टी. वॉशिंगटनचा जन्म १८५८ मध्ये व्हर्जिनिया येथे झाला.

त्याचे वडील कोण होते हे त्याला कधीच कळू शकलं नाही. तो आपली आई, मोठा भाऊ आणि एक बहीण यांच्याबरोबर राहत असे. त्यांचं घर म्हणजे एका शेतातील एकाच खोलीची छोटीशी झोपडी होती.

बुकर आणि त्याच्या कुटुंबातील लोक हे गुलाम होते. ते सारे त्या शेताचा मालक असणाऱ्या गोऱ्या गृहस्थाच्या मालकीची संपत्ती म्हणून गणले जात. १८५८ साली अमेरिकेच्या दक्षिणेकडील राज्यांमध्ये अनेक निग्रो हे गुलाम होते. पण उत्तरेकडील राज्यांतील निग्रो स्वतंत्र होते.

बुकर आणि त्याच्या कुटुंबियांचं आयुष्य साधं-सरळ, सुखदायी मुळीच नव्हतं. हिवाळ्यात त्यांच्या झोपडीत खूप थंडी पडत असे आणि उन्हाळ्यात झोपडी प्रचंड गरम होई.

झोपडीत पलंग वगैरे काही नव्हते. रात्री बुकर आणि त्याचे कुटुंबीय जमिनीवर झोपत.





सर्व गुलामांना शेतांमध्ये प्रचंड राबावं लागत असे. बुकर थोडा मोठा झाला तसे त्यालाही खूप कष्ट करावे लागले.



कधी कधी त्याला बादलीत पाणी भरून ती जड बदली शेतात काम करणाऱ्या लोकांकडे घेऊन जावं लागत असे.



कधी कधी त्याला धान्य दळण्यासाठी गिरणीत घेऊन जावं लागे. शेतापासून गिरणी तीन मैल दूर होती. तो गिरणीतून घरी परतेपर्यंत अंधार पडत असे.

बुकरला भर जंगलातून अंधारात एकट्याने यायला भीती वाटे. पण त्याचा नाईलाज होता. गिरणीतून घरी परत येण्यासाठी दुसरा कोणताच रस्ता नव्हता.





त्याच्या शेतमालकाची एक छोटी मुलगी होती. ती शाळेत जात असे. एके दिवशी बुकरला तिची पुस्तकं उचलून शाळेपर्यंत नेण्यास सांगितलं गेलं. शाळेत पोहोचल्यावर मुलगी आत निघून गेली.

बुकरला मात्र बाहेरच थांबावं लागलं. दक्षिण अमेरिकेतील निग्रो मुलं शिकायला शाळेत जाऊ शकत नसत. त्यामुळे दक्षिणेकडील बहुसंख्य निग्रोंना वाचता येत नसे. कित्येकजण तर आपलं नावसुद्धा लिहू शकत नसत.



शाळेच्या दाराजवळ उभ्या असलेल्या बुकरने आत डोकावून पाहिलं. त्याने त्या छोट्या मुलीला आणि इतर गोऱ्या मुलांना शिकताना पाहिलं.

त्या दिवसापासून त्याच्या मनात शाळेत जायची इच्छा बळावू लागली.

त्याला वाचायला आणि लिहायला शिकायची खूप इच्छा होती.



बुकर खूप लहान असताना अमेरिकेत नागरी युद्ध सुरु झालं.

लोक अनेक कारणांसाठी युद्धं करतात. उत्तरेकडील आणि दक्षिणेकडील राज्यांकडे नागरी युद्ध करण्यासाठी अनेक कारणं होती.

त्यांपैकी एक कारण होतं की उत्तरेतील राज्यांना अमेरिकेतील निग्रो स्वतंत्र व्हावेत, असं वाटत होतं.



दक्षिणेतील राज्यांना मात्र त्यांना गुलामच राहू द्यायचं होतं.

या कारणामुळे उत्तर आणि दक्षिणेतील राज्यांमध्ये चार वर्षं एक मोठं युद्ध झालं.





बुकर सात वर्षांचा असताना एका सकाळी सर्व गुलामांना कामावरून परत बोलावण्यात आलं. ते सारे त्यांच्या मालकाच्या घरी जमले.

नागरी युद्ध संपलं असून उत्तरेकडील राज्यं युद्धात जिंकली असल्याचं शेतमालकाने सांगितलं.

उत्तरेहून आलेला एक सैनिक तिथे उपस्थित होता. त्याने एक संदेश वाचला. ती राष्ट्राध्यक्ष लिंकन यांनी गुलामांना मुक्त करण्याविषयी केलेली घोषणा होती.

त्या घोषणेत अमेरिकेत गुलामगिरीवर कायमची बंदी आणली गेली असल्याचं म्हटलं होतं.



आता कोणताही पुरुष, स्त्री किंवा मूल कोणाच्याही 'मालकीचे' असू शकणार नव्हते. दक्षिणेकडील राज्यांतील सर्व गुलाम मुक्त झाले होते.



शेतात काम करणारे सर्व निग्रो काही वेळासाठी खूप आनंदी झाले. बुकरची आई म्हणाली की ती कितीतरी काळापासून या दिवसाची वाट बघत होती. तिच्या डोळ्यांतून आनंदाश्रू वाहू लागले.

पण काही वेळातच बुकर आणि त्याचे कुटुंबीय उदास झाले. त्यांच्या अडचणी अजून संपल्या नव्हत्या, हे त्यांच्या लक्षात येऊ लागलं. आता ते स्वतंत्र झाल्यामुळे ज्या गोष्टींवर त्यांनी कधीच विचार केला नव्हता, त्या गोष्टींचा त्यांना विचार करावा लागला.



आता आपला उदरनिर्वाह कसा होणार याची चिंता त्यांना भेडसावू लागली.

आपल्या पोटा-पाण्यासाठी, जगण्यासाठी काय काम करावं या काळजीत ते पडले.



कपडे, अन्न खरेदी करण्यासाठी त्यांना पैसे हवे होते. स्वतंत्र लोक ज्या वस्तू खरेदी करतात त्या वस्तू घेण्यासाठी त्यांना पैशांची गरज होती.



काही काळानंतर बुकरच्या आईला कळलं की वेस्ट व्हर्जिनिया मध्ये त्यांना काम मिळू शकेल. त्यांच्याकडे जे काही थोडं सामान होतं, ते त्यांनी एका गाडीत ठेवलं. गाडीला एक खेचर जुंपलं आणि मग डोंगरांवरून जाणाऱ्या रस्त्यावर ते चालू लागले.

प्रवास खूप लांबचा होता. जवळजवळ पूर्ण प्रवासात बुकर गाडीच्या बरोबरीने चालत राहिला.

वेस्ट व्हर्जिनियाला पोहोचल्यावर बुकरला एका कोळशाच्या खाणीत काम मिळालं. खाणीत खूप अंधार आणि घाण होती.





एखाद्या लहान मुलासाठी तिथे काम करणं ही भयंकर गोष्ट होती. पण बुकरला हे माहीत होतं, की त्याच्या आईला पैशांची फार गरज होती. त्यामुळे तो सकाळपासून रात्रीपर्यंत कोळशाच्या खाणीत काम करत असे.

अजूनही बुकरच्या मनात शाळेत जाण्याची इच्छा होती. त्याच्या आईचीही तशीच इच्छा होती. म्हणूनच खाणीत दिवसभर काम करून झाल्यावर तो रात्री शाळेत जाऊ लागला.

त्या शाळेत फक्त एकच शिक्षक होते. त्यांच्याकडे फक्त दोन-तीनच पुस्तकं होती.



विद्यार्थ्यांमध्ये काही लहान मुलं होती, तर काही असे पुरुष आणि स्त्रिया ज्यांना कधीच शाळेत जाण्याची संधी मिळाली नव्हती.



त्या शाळेत जेवढं शिकता येणं शक्य होतं तेवढं बुकर शिकला. एके दिवशी दुपारी त्याने दोघाजणांना आपापसात बोलताना ऐकलं. ते व्हर्जिनियामधील हॅम्पटन इंस्टिट्यूट नावाच्या एका मोठ्या शाळेविषयी बोलत होते.

ते दोघे म्हणत होते, की हॅम्पटन इंस्टिट्यूट ही निग्रो लोकांसाठीची शाळा होती. बुकरसारखा गरीब मुलगासुद्धा शिकण्यासाठी तिथे जाऊ शकत होता. तो जेवढं घरी शिकू शकत होता, त्यापेक्षा कितीतरी जास्त त्याला त्या शाळेत शिकता येणार होतं.



त्या रात्री बुकर ने आपल्या आईला त्याने ऐकलेलं सगळं सांगितलं. हॅम्पटन इंस्टिट्यूट बरीच लांब असली, तरीही त्याला तिथे जायची इच्छा होती.





पुढची दोन वर्षं बुकरने शक्य तेवढे पैसे वाचवले. त्याच्या कुटुंबानेही त्याला मदत करण्याचा पूर्ण प्रयत्न केला. गावातल्या इतर निग्रो लोकांनीही त्याला मदत केली. त्यांनी बुकरला थोडेसे पैसे दिले. या गरीब लोकांकडे तेवढेच पैसे होते.

शेवटी त्याची जाण्याची वेळ झाली. त्याने आपल्या मित्रांचा आणि कुटुंबाचा निरोप घेतला. त्याची आई आता म्हातारी झाली होती आणि आजारीसुद्धा होती. तो यानंतर आईला पुन्हा भेटू शकेल की नाही, हे त्याला माहीत नव्हतं.

सुरुवातीचा प्रवास त्याने घोडागाडीमधून केला. एका रात्री खूप थंडी पडलेली असताना त्याची घोडागाडी डोंगराळ भागात एका छोट्या हॉटेलपाशी थांबली. पण हॉटेलच्या मालकाने बुकरला तिथे राहू देण्यास नकार दिला. एका निग्रोला त्याच्या हॉटेलमध्ये मुळीच राहता येणार नाही, असं त्याने सांगितलं.





कडाक्याच्या थंडीत ऊब मिळावी म्हणून बुकर रात्रभर हॉटेलभोवती चकरा मारत राहिला. त्याने ऐकलं होतं की अमेरिकेत बरेचसे गोरे लोक निग्रो लोकांचा द्वेष करतात. पण पहिल्यांदाच अशा प्रकारचा द्वेष तो प्रत्यक्षात अनुभवत होता.



डोंगराळ भाग पार केल्यावर बुकर रेल्वेने रिचमंड येथे आला. तो या शहरात पोहोचला, तेव्हा त्याच्याकडे काहीच पैसे उरले नव्हते.

तो शहरात फिरू लागला. एका दुकानाच्या खिडकीतून त्याला आत ठेवलेले चविष्ट 'ॲपल पाय' दिसले. पण त्यातील एकही ॲपल पाय विकत घेण्यासाठी त्याच्याजवळ पैसे नव्हते.

अंधार पडला तसा तो एका छोट्याशा लाकडी पुलाजवळ आला. तो भुकेला आणि थकलेला होता. त्या पुलाखाली त्याने अंग टेकलं. झोप लागेपर्यंत त्याला पुलावरून लोकांच्या चालण्याचे आवाज ऐकू येत होते.



दुसऱ्या दिवशी सकाळी त्याला पाण्यात एक जहाज दिसलं. जहाजावर भरलेली खोकी वाहण्याचं काम त्याला मिळू शकेल, असं जहाजाच्या कप्तानाने त्याला सांगितलं.



बुकरने एक आठवडाभर ते काम केलं. पैसे वाचवण्यासाठी तो रोज रात्री त्याच लाकडी पुलाच्या खाली झोपत असे. आठवड्याच्या शेवटी त्याने इतके पैसे जमवले, की आता तो हॅम्पटन इंस्टिट्यूट पर्यंत रेल्वेने प्रवास करू शकत होता.



जनरल सॅम्युअल सी. आर्मस्ट्रॉंग हे हॅम्पटन इंस्टिट्यूट चालवत असत. नागरी युद्धाच्या वेळी ते उत्तरेकडील राज्यांच्या सेनेचे अधिकारी होते. आता त्यांना दक्षिणेतील गोऱ्या आणि निग्रो लोकांची शक्य तेवढी मदत करायची होती.



बुकर टी. वॉशिंगटन हॅम्पटनमध्ये तीन वर्षं राहिला. कठीण कठीण पुस्तकंही वाचायला तो शिकला. लोकांसमोर सभाधीटपणे बोलायला आणि श्रोत्यांना आपल्या बोलण्याने खिळवून ठेवायलाही शिकला.





हॅम्पटनमध्ये त्याने आणखी एक गोष्ट ठरवली. ती म्हणजे, शिक्षक बनून इतर निग्रो लोकांची मदत करायची, ज्यामुळे निग्रोंना जगात त्यांचं एक स्थान निर्माण करता येईल.



एके दिवशी जनरलला एक पत्र आलं. पत्रात लिहिलं होतं-

अल्बामा राज्यातील टस्किगी येथे निग्रो लोकांसाठी एक नवीन शाळा सुरु होणार आहे.

जनरल त्यासाठी मदत करतील का? हॅम्पटनमधून ते एका शिक्षकाला नव्या शाळेचा मुख्याध्यापक म्हणून काम करण्यासाठी पाठवू शकतील का?



जनरलनी आपण सर्वोत्तम शिक्षक पाठवू, असं उत्तर दिलं. त्यांनी बुकर टी. वॉशिंगटनला तिथे पाठवलं.

दोन वर्षं बुकरने वेस्ट व्हर्जिनियामधील शाळेत शिक्षक म्हणून काम केलं. त्यानंतर एक रात्रशाळा चालवण्यासाठी जनरल आर्मस्ट्राँग यांनी त्याला हॅम्पटन येथे परत बोलावलं.



आयुष्यातील शेवटच्या दिवसांपर्यंत बुकर टी. वॉशिंगटन याने टस्किगी शाळेमध्ये मुख्याध्यापक म्हणून काम केलं. दिवसेंदिवस टस्किगी इंस्टिट्यूट प्रसिद्ध होत गेली. अमेरिकेतील ही अशी पहिली शाळा होती, जी निग्रो लोक स्वतः चालवत होते.

टस्किगीमधील विद्यार्थी अनेक गोष्टी शिकले.

ते आपल्या घरांसाठी टेबल, खुर्च्या आणि पलंग बनवायला शिकले.





शेती करायला शिकले.

निरोगी आणि सशक्त बनण्यासाठी कोणता आहार घ्यायला हवा ते शिकले.

ते आणखीही एक गोष्ट शिकले. आपली शाळा आणि आपल्या स्वतःबद्दल अभिमान बाळगायला शिकले.



टस्किगी इंस्टिट्यूटच्या मुख्याध्यापकाचं काम सोपं नव्हतं. शाळेला पैशांची नेहमीच अडचण असायची. बुकर टी. वॉशिंगटनला वारंवार पैशांची जुळवाजुळव करावी लागे.

उत्तर अमेरिकेत जाऊन तिथल्या लोकांना त्याने टस्किगी इंस्टिट्यूटची गोष्ट सांगितली. ती त्याने इतकी प्रभावीपणे सांगितली, की कित्येक श्रीमंत लोकांनी लगेच शाळेसाठी पैसे दिले.



जसजशी वर्षं गेली, तशी टस्किगी इंस्टिट्यूट जगभरात प्रसिद्ध झाली. आणि बुकर टी. वॉशिंगटनसुद्धा.



उत्तर आणि दक्षिण अमेरिकेत, दोन्हीकडे त्याचे बरेच मित्र होते. एका वसंत ऋतूमध्ये त्याच्या मित्रांनी त्याला थकलेलं पाहिलं. त्यांनी त्याला काही काळ विश्रांती घेण्याचं सुचवलं. त्यांनी बुकरला जहाजाचं तिकीट काढून दिलं आणि युरोपात पाठवलं. जवळजवळ वीस वर्षांत ही त्याची पहिलीच सुट्टी होती.

तो जिथे जाई, तिथे लोक त्याला भेटण्यासाठी आतुर असत. ते अशा एका माणसाला भेटण्यासाठी उत्सुक असत, जो एक गुलाम म्हणून जन्माला आला; पण तरीही मोठा होऊन खूप प्रसिद्ध झाला.





इंग्लंडमध्ये असताना राणी व्हिक्टोरियाकडून त्याला चहापानाचं निमंत्रण आलं. तो विंडसर पॅलेसला जाऊन राणीला भेटला. राणीने त्याच्याकडून टस्किगी इंस्टिट्यूटबद्दल जाणून घेतलं. गुलामगिरीच्या प्रथेबद्दल विचारलं. तिनेही त्याला तेच प्रश्न विचारले, जे इतर लोक विचारत. ती प्रसिद्ध राणी होती तरीसुद्धा.



प्रवास पूर्ण झाल्यावर बुकर टी. वॉशिंगटन घरी परतला. पुढेही बरीच वर्षं त्याने टस्किगीमध्ये भरपूर मेहनत केली.

कदाचित त्याने खूपच जास्त कष्ट घेतले. १९१५ मध्ये जेव्हा त्याचा मृत्यू झाला, तेव्हा अनेकांनी म्हटलं की हा मृत्यू अति परिश्रम केल्यामुळेच झाला.

कोणतीही व्यक्ती सर्वांना खूष ठेवू शकत नाही. बुकर टी. वॉशिंगटनसुद्धा सर्वांना खूष करू शकला नाही. त्याच्या मृत्युनंतर काही लोक म्हणाले, की टस्किगी इंस्टिट्यूट ही जशी होती त्यापेक्षा आणखी चांगली होऊ शकली असती.



काही लोक असंही म्हणाले, की बुकर टी. वॉशिंगटनने ज्या गोष्टींचा कधीच विचार केला नाही, त्या गोष्टींचाही विचार करायला हवा होता. त्याने जे काम केलं नाही, तेही करायला हवं होतं.



पण बुकर टी. वॉशिंगटन ही एक महान व्यक्ती होती, असंच बहुतेकांचं मत होतं. त्याने टस्किगीमध्ये एक अद्‌भुत शाळा चालवली. आपल्या वंशाच्या लोकांना स्वाभिमानी बनवलं. बहुतेक लोक त्याला त्याच्या या कार्यासाठीच नेहमी लक्षात ठेवतील.

तो एक अशी व्यक्ती म्हणून लोकांच्या स्मरणात राहील, जिने स्वतः गुलाम म्हणून जन्माला येऊनही अमेरिकेतील निग्रोंना गुलामीतून मुक्त होण्यासाठी मदत केली.

समाप्त